**महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँक मर्या.,मुंबई व जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँकांकरीता राबविण्यात आलेल्या एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एलडीबी-१०१६/प्र.क्र.११५/७-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २४ सप्टेंबर, २०१८.

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक एलडीबी-१००७/प्र.क्र.५५०/७-स, दि. २८.९.२००७, तसेच शुध्दीपत्रक दि. ७.१२.२००७
२) शासन निर्णय एलडीबी-१००७/प्र.क्र.५५०/७-स,दि.१८.८.२००८, दि. २४.७.२००९, दि. ३०.७.२०१०, दि. ७.४.२०११, दि. ०३.०१.२०१२, दि. २३.५.२०१२ व दि. ६.९.२०१३
३) शासन निर्णय क्र. एलडीबी -१०१३/प्र.क्र.६९९/७-स,दि. २४.७.२०१५
४) शासन निर्णय क्र. एलडीबी -१०१६/प्र.क्र.११५/७-स, दि. ४ जुलै, २०१६
५) शासन निर्णय क्र. एलडीबी -१०१६/प्र.क्र.११५/७-स, दि. १६ ऑगस्ट, २०१७

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँक म., मुंबई व जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँकांकरीता एकरकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास शासनाने दि. २८.९.२००७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली होती. तसेच या योजनेतंर्गत अर्ज स्विकृतीसाठी दि. ७.१२.२००७ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये १८० दिवसांची मुदत देण्यात आली होती.

सदर योजनेचा लाभ जास्तीत जास्त शेतकरी सभासदांना व्हावा यासाठी संदर्भाधिन क्रमांक २ नुसार दि. १८.८.२००८, दि. २४.७.२००९, दि. ३०.७.२०१०, दि. ७.४.२०११, दि. २३.५.२०१२ व दि. ६.९.२०१३ अन्वये या योजनेस दिनांक ३१.३.२०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

दरम्यान या बँकांचे कामकाज अनेक वर्षापासून ठप्प असल्याने या बँकाबाबत अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी दिनांक १७.१२.२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यात आली होती. सदर मंत्रीमंडळ उपसमितीने दिनांक १८.३.२०१५ रोजी शासनास सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने

भूविकास बँकांसदर्भात दिनांक २४.७.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये धोरणात्मक निर्णय घेण्यात आला असून त्यानुसार एकरकमी कर्ज परतफेड योजनेस दिनांक ३१.३.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. तद्नंतर संदर्भाधिन क्र.४ येथील दिनांक ०४ जुलै, २०१६ च्य शासन निर्णयान्वये दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत व संदर्भाधिन क्र.५ येथील दिनांक १६.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ३१.०३.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

बँकेची दिर्घ कालावधी पासूनची थकीत कर्जे विचारात घेता, एकरकमी कर्ज परतफेड योजनेचा जास्तीत जास्त सभासदांना लाभ घेता यावा यासाठी सदर योजनेस पुन्हा मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

**१.** महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँक मर्या., मुंबई व जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँकांकरीता राबविण्यात आलेल्या एकरकमी कर्ज परतफेड योजनेस दि. ३१.३.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच या योजनेतंर्गत अर्ज स्विकृतीची मुदत दि.२८.२.२०१९ पर्यंत राहील.

**२.** सदर योजना महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँक मर्या., मुंबई व २९ जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशिय विकास बँकांपूरती मर्यादित राहील. “एकरकमी कर्ज परतफेड योजनेची” मार्गदर्शक तत्वे ही शासन निर्णय क्रमांक एलडीबी-१००७/प्र.क्र.५५०/७-स, दि.२८.९.२००७ मधील **परिशिष्ट -अ** प्रमाणेच राहतील.

**३.** सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तूत योजनेस व्यापक प्रसिध्दी देऊन बँकेच्या जास्तीत जास्त शेतकरी सभासदांना या योजनेचा लाभ मिळेल या दृष्टीने प्रयत्नशील रहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२४१७२७१४०२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.09.24 17:32:04 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. मा.विधान सभा/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
३. अवसायक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक म., मुंबई, १५-ए, मोरवी लेन, चौपाटी, मुंबई-४०० ००७.
४. सरव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि ग्रामीण विकास बँक, ५४, वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पो. बॉ. नं. ५, पुणे-५
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
७. जिल्हा व्यवस्थापक, जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक (सर्व)
८. निवड नस्ती.